## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २० जानेवारी २००५

## आदेश

**प्रिझन ॲक्ट, १८९४.**

क्रमांक जेएलडी. ३२९९/१७४/१२१/पीआरएस-१.—कारागृह कायदा, १८९४ (१८९४ चा कायदा ९) च्या कलम ५९ (१०) आणि त्या अनुषंगाने प्रदान करण्यात आलेल्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून अणि या संदर्भात अस्तित्वात असलेले सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून याद्वारे शासन महाराष्ट्र शासनाच्या गृह विभागाच्या अखत्यारीतील कारागृहाच्या आस्थापनेवरील शिपाई (Sepoy) (गट-क) या पदाच्या सेवा भरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे, जसे,—

१. या नियमांना कारागृह शिपाई (Sepoy) गट-क (सेवा प्रवेश) नियम, २००५ असे संबोधण्यात यावे.

२. (१) कारागृह विभागातील कारागृह शिपाई (गट-क) या पदावरील निवडीसाठी उमेदवारांकडे वयोमर्यादा, किमान शैक्षणिक अर्हता व शारीरिक पात्रता खाली दर्शविल्याप्रमाणे असणे आवश्यक आहे :—

(अ) **वय**.—कमीत कमी १८ वर्षे व जास्तीत जास्त ३३ वर्षे. परंतु कमाल वयोमर्यादेत मागासवर्गीय उमेदवारांना वेळोवेळच्या शासन धोरणानुसार सूट देण्यात येईल.

(ब) **शैक्षणिक अर्हता**.—महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, १९६५ (सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम ४१) अन्वये प्रस्तावित केलेल्या विभागीय मंडळाकडून घेण्यात येणारी उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा अथवा शासनाने या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेली परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

(क) **शारीरिक पात्रता**.—

| | महिला | पुरुष |
|---|---|---|
| (१) उंची .. | किमान १५५ सें.मी. | किमान १६५ सें. मी. |
| (२) छाती .. | ... | न फुगवता ७९ सें. मी. व फुगवून ८४ सें. मी. (फुगवून व न फुगवता यातील फरक किमान ५ सें. मी. असावा.) |
| (३) वजन .. | ४८ कि. ग्रॅ. | ... |

३. (१) (अ) जे उमेदवार विहित शारीरिक व शैक्षणिक पात्रता पूर्ण करीत असतील त्यांना १०० गुणांची शारीरिक पात्रता परीक्षा द्यावी लागेल. ही शारीरिक चाचणी खालीलप्रमाणे एकूण १०० गुणांची राहील :—

| | |
|---|---|
| (१) १०० मीटर्स धावणे | १० गुण |
| (२) लांब उडी | १० गुण |
| (३) उंच उडी | १० गुण |
| (४) गोळा फेक | १० गुण |
| (५) ८०० मीटर्स धावणे | २० गुण |
| (६) आर्म्सटॅकल कोर्स | २० गुण |
| (७) पूल अप्स (१०) | १० गुण |
| (८) दोरावर चढणे | १० गुण |
| एकूण . . | १०० गुण |

उमेदवाराने ही परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी किमान ५० गुण मिळवणे आवश्यक राहील.

(ब) जे उमेदवार शारीरिक पात्रता परीक्षा उत्तीर्ण होतील, त्यांना ८० गुणांची लेखी चाचणी द्यावी लागेल. त्यामध्ये खालील विषयांचा समावेश असेल :—

(१) चालू घडामोडी

(२) सामान्यज्ञान

(३) अंकगणित

(४) निबंध लेखन

उमेदवाराने ही परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी किमान ४०% गुण मिळवणे आवश्यक राहील.

(क) (१) जे उमेदवार लेखी चाचणी उत्तीर्ण होतील, त्यांना २० गुणांची मुलाखत चाचणी द्यावी लागेल. त्यामध्ये खालील बाबींचा समावेश असेल :—

(१) उमेदवाराचे सर्वसाधारण व्यक्तिमत्व,

(२) क्रीडा, एन. सी. सी. अथवा तत्सम कार्यक्षमता, आणि

(३) इतर विशेष कार्यक्षमता उदा. संगणकाचे ज्ञान अथवा समकक्ष तंत्र प्रशिक्षण अथवा उच्च शिक्षण.

(२) वरील निकषाच्या आधारे निवड मंडळ उमेदवारांची पात्रता/योग्यता ठरवील.

४. कारागृह विभागातील कारागृह शिपाई (गट-क) या पदावरील भरतीसाठी (ज्येष्ठतेनुसार व आरक्षणानुसार) संबंधित सेवायोजन कार्यालयाकडून, समाजकल्याण अधिकारी किंवा जिल्हा सैनिक बोर्ड किंवा आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या केंद्राच्या संबंधित कार्यालयाकडून उमेदवारांची नावे मागविण्यात येतील. रिक्त पदांबाबतची जाहिरात वर्तमानपत्रातील जाहिरातीद्वारे किंवा कार्यालयातील सूचना फलकावर लावून दूरदर्शन, रेडिओ यावर जाहीर केली जाईल :

परंतु असे की, खालील प्रवर्गातील उमेदवारांचा कारागृह शिपाई भरतीसाठी थेट विचार करण्यात येईल. त्यांना सेवायोजन कार्यालयाच्या अथवा वर नमूद इतर संस्थांच्या शिफारस पत्राची आवश्यकता असणार नाही. मात्र त्याचे नाव जवळच्या/संबंधित सेवायोजन कार्यालयात नोंदविलेले असणे आवश्यक राहील,—

(अ) कारागृह शिपाई ते सुभेदार दर्जापर्यंतच्या कर्मचाऱ्यांच्या फक्त एका मुलास किंवा मुलीस ;

(ब) स्वातंत्र्य सैनिक अथवा माजी सैनिक या प्रवर्गातील उमेदवार, मात्र त्यांना जिल्हाधिकाऱ्यांचे विहित प्रमाणपत्र सादर करावे लागेल.

५. कारागृह विभागातील बेपत्ता कर्मचारी किंवा असाध्य रोगामुळे किंवा अन्य कारणांमुळे वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या प्रमाणपत्रानुसार ज्यांना वैद्यकीय कारणास्तव सेवानिवृत्त करण्यात आले आहे किंवा जे सेवेत असताना मृत पावले आहेत अशा कर्मचाऱ्यांच्या एकाच मुलास किंवा मुलीस कारागृह शिपाई भरतीसाठी बोलविण्यात येईल. तसेच त्याला शारीरिक मोजमापात खालील सवलती देय असतील.

| शारीरिक पात्रता | | महिला | पुरुष |
|---|---|---|---|
| (१) उंची | . . | २.५ सें.मी. | २.५ सें.मी. |
| (२) छाती | . . | . . . | न फुगवता २ सें. मी.<br>फुगवून १.५ सें. मी. |

६. धरणग्रस्त व प्रकल्पग्रस्तांसाठी भरतीसाठी प्रत्येक भरतीत एकूण रिक्त पदांच्या ५ % पदे आरक्षित असतील कोणत्याही जिल्ह्यात भरतीसीठी अर्ज करण्याची परवानगी असेल. प्रकल्पग्रस्त व भूंकपग्रस्तांस सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची आवश्यकता असणार नाही. तसेच प्रकल्पग्रस्त व भूकंपग्रस्तांना कमाल वयोमर्यादेत ५ वर्षांची सूट राहील.

७. कारागृह शिपाई या पदावर नेमणूक झालेल्या व्यक्तीला सूट मिळाली नसेल तर विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

८. कारागृह शिपाई या पदावर नियुक्त केलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली होण्यास पात्र राहील.

९. कारागृह शिपाई या पदावर नियुक्त केलेल्या उमेदवाराकडे या पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल व संबंधित परीक्षा तीन संधीमध्ये उत्तीर्ण व्हावी लागेल. जर तीन संधींमध्ये तो परीक्षा उत्तीर्ण झाला नाही तर त्याची सेवा समाप्त करण्यात येईल.

१०. कारागृह शिपाई पदावर नियुक्ती झालेल्या उमेदवारास संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे संगणक हाताळणीबाबतचे प्रमाणपत्र असणे आवश्यक आहे. अन्यथा सदर प्रमाणपत्र नियुक्तीपासून दोन वर्षांत सादर करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**किरण ठाकूर,**
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated 20th January 2005

### Order

PRISONS ACT, 1894.

No. JLD/3299/174/121/PRS-1.—In exercise of the powers conferred by clause (10) of sub-section (*1*) of Section 59 of the Prisons Act, 1894 (9 of 1894) and of all other powers enabling it in this behalf and in supersession of all the existing rules, orders and notifications made in this behalf, the Government of Maharashtra hereby makes the following rules for regulating recruitment to the post of Jail Sepoy, Group-C in the Prisons under the Home Department of the Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Jail Sepoy, Group-C, in the prisons under the Home Department of the Government of Maharashtra (Recruitment) Rules, 2005.

2. A candidate for selection to the post of Jail Sepoy, Group-C, in the prisons under the Home Department of the Government of Maharashtra shall be required to possess age limit, minimum educational quilifications and physical standards, as follows, namely :—

(*a*) *Age*.—Minimum age shall be 18 years and Maximum age shall be 33 years :

Provided that, the maximum age limit in respect of backward class candidates shall be relaxable as per Government Policy from time to time.

(*b*) *Educational Qualification*.—Passed the Higher Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965) and includes any other examinations declared by Government to be equivalent thereto.

(*c*) *Physical Standard*.—

| | Female | Male |
|---|---|---|
| (*i*) Height .. | Minimum 155 centimeters. | Minimum 165 centimeters. |

(*ii*) Chest . . . . . 79 centimeters on deflated, 84 centimeters on expanded (difference would be minimum 5 cm.).

(*iii*) Weight . . 48 Kgs. . . .

3. (1) (*a*) The candidates who fulfill the physical standard and educational qualification shall be required to appear for the physical fitness test of 100 marks. The physical test will be of total 100 marks as follows, namely :—

| | | |
|---|---|---|
| (1) 100 meters running | . . | 10 marks |
| (2) High jump | . . | 10 marks |
| (3) Long jump | . . | 10 marks |
| (4) Shot put | . . | 10 marks |
| (5) 800 meters running | . . | 20 marks |
| (6) Arms tackle course | . . | 20 marks |
| (7) Pull ups (10) | . . | 10 marks |
| (8) Rope climbing | . . | 10 marks |
| Total | . . | 100 marks |

A candidate is required to secure 50 marks for passing this examination.

(b) The candidates who pass the physical fitness test shall be required to appear for written test of 80 marks which will include the following subjects, namely :—

(1) Current Affairs

(2) General knowledge

(3) Arithmetic, and

(4) Essay Writing

A candidate is required to secure not less than 40 per cent marks for passing this examination.

(*c*) (1) The candidates who pass the written test shall be required to appear for the following oral test of 20 marks namely :—

(*i*) General Personality of the candidate ;

(*ii*) Sports, N.C.C. or equivalent activities ; and

(*iii*) Other special performance e.g. knowledge of Computer operation or equivalent technical training or higher education.

(2) On the basis of above criteria the interview Board shall decide the fitness of the Candidates.

4. Appointment to the post of Jail Sepoy, Group-C, in the prison shall be made from amongst the candidates called from Employment Exchange, according to seniority and reservation, Social Welfare Office or District Military Board or Training Centres conducted by the Tribal Development Department of the respective unit and by publication of the information of vacant posts in the newspapers or displaying on office notice board or announcing on radio or television :

Provided that, the candidates from the following categories may be directly considered for a recruitment without call letter of any employment Exchange or other bodies referred above, their names shall be registered in concerned nearest Employment Exchange namely :—

(*a*) Only one son or daughter of prison official from the rank of Jail Sepoy to Subhedar ;

(*b*) Candidates from the category of Freedom Fighter or Ex-Servicemen who shall be required to submit a prescribed certificate obtained from the concerned Collector of the District.

5. One son or daughter of a Jail Sepoy who is missing or has retired on compassionate ground on the basis of medical certificate due to ill health, or so, or has died while in service, may be called for the Jail Sepoy recruitment and he or she may get the following relaxation in respect of the physical standard, namely :—

*Physical Sandard.*—

| | Female | Male |
|---|---|---|
| (*i*) Height | . . 2.5 centimeters | 2.5 centimeters |
| (*ii*) Chest | . . . . . | 2 centimeters (Deflated)<br>1.5 centimeters (Expanded). |

6. Out of the total posts available for recruitment to the posts of Jail Sepoy five per cent shall be reserved for project-affected person. The project affected persons need not require recommendation of the Employment Exchange, etc. Similarly maximum age limit is relaxable by five yeats, in respect of recruitment for such project affected candidates. Project affected person can apply in any district.

7. A person appointed to the post of Jail Sepoy shall be required to pass examinations in Hindi and Marathi according to the rules made in that behalf, unless he has already passed, or has been exempted from passing, those examinations.

8. A person appointed to the post of Jail Sepoy shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

9. A person appointed to the post shall be required to complete the training prescribed for the post and have to pass concerned examinations within three chances. If he fails to pass the said examinations within three chances, his service shall be terminated.

10. A person appointed to the post of Jail Sepoy shall be required to posses a certificate in computer operation prescribed by Directorate of Information Technology, Government of Maharashtra, or submit it within 2 years from appointment.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

KIRAN THAKUR,

Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई